छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर येथील आवारातील इमारतींचे टेरेस शेडचे बांधकाम करणे बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : जीएचके-२०२४/प्र.क्र.४८४/प्रशा-१,

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१

दिनांक : ०१ ऑगस्ट, २०२४

**वाचा :** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संवैशिवसं/कोल्हापूर/ आइमाटेरेसशेडबांध/११५५५/आय-प/२०२४, दिनांक २६.०७.२०२४

**शासन निर्णय :**

छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर येथील आवारातील विविध इमारतींचे टेरेस शेडचे बांधकाम करण्यासाठी रुपये ९,७१,७८,३१४/- (रुपये नऊ कोटी एकाहत्तर लक्ष अठ्ठयाहत्तर हजार तीनशे चौदा फक्त) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १) | कोल्हापूर सीपीआर येथील नर्सिंग हॉस्टेल इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | १४२६१०१८ |
| २) | कोल्हापूर सीपीआर येथील दुधगंगा इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ९९२९६३४ |
| ३) | कोल्हापूर सीपीआर येथील वेदगंगा इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ११२९५०५३ |
| ४) | कोल्हापूर सीपीआर येथील ऑपरेशन थेटर इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ६७६३८१३ |
| ५) | कोल्हापूर सीपीआर येथील ट्रामा सेंटर इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ६०६७४८३ |
| ६) | कोल्हापूर सीपीआर येथील ई.एन.टी. इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | १६४९३०५ |
| ७) | कोल्हापूर सीपीआर येथील टी.बी. इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ३५९७९६८ |

| | | |
|---|---|---|
| ८) | कोल्हापूर सीपीआर येथील आय इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ४४८२१३६ |
| ९) | कोल्हापूर सीपीआर येथील लायब्ररी इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ७४४३८६९ |
| १०) | कोल्हापूर सीपीआर येथील तुळशी इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ३९७०५२९ |
| ११) | कोल्हापूर सीपीआर येथील एनआयसीयु इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ५८७४८४४ |
| १२) | कोल्हापूर सीपीआर येथील मेंटल इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ३१५२१९९ |
| १३) | कोल्हापूर सीपीआर येथील कोयना इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | १४६७५२३४ |
| १४) | कोल्हापूर सीपीआर येथील एच.ई.आर. इमारतीकरीता टेरेस शेडचे बांधकाम करणे. | ४०१५२२९ |
| | **एकूण अंदाजित रक्कम** | **९,७१,७८,३१४** |

**अटी :-**

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत इमारतीचे काम करण्यात येत असल्यास, त्या इमारतीचे आराखडे शासकीय वास्तुशास्त्रज्ञाकडून तपासून घेण्यात यावे.

९) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३- वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५- विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०११२४१०८३६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.08.01 16:13:28 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर
६) अधिष्ठाता, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
८) निवडनस्ती (प्रशा-१)